**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- असप-१२२२/प्र.क्र.११०/का.१४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १२ जुलै, २०२३.

**आदेश**

श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव, ग्राम विकास विभाग यांची सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, अमरावती यांच्या आस्थापनेवरील “उप सचिव” या पदावर प्रथमत: तीन वर्षासाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, ग्राम विकास विभाग व सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-६) यांनी आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभागामार्फत (कार्यासन-६) हाताळण्यात येतील.

४. श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव यांना राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, अमरावती यांच्या आस्थापनेवरील “उप सचिव” या पदावर रुजू होण्यासाठी ग्रामविकास विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, अमरावती यांनी श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव यांना तात्काळ रुजू करुन घ्यावे.

५. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४५/१८ (र. व का.), दि.२५.०८.२०२२ मध्ये नमूद केल्यानुसार संबंधित अधिकाऱ्याने कार्यमुक्त होताना कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र देणे बंधनकारक आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०७१२१४०५००५८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.07.12 14:07:03 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स./प्र.स., मंत्रालय, मुंबई-३२
३) अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) अ.मु.स./प्र.स./सचिव, ग्रामविकास विभाग व सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) सह/उप सचिव (आस्थापना) ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) आयुक्त, राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, अमरावती
७) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-६), मंत्रालय, मुंबई-३२
८) श्री.देविसिंग हरिसिंग डाबेराव, अवर सचिव, ग्रामविकास विभाग (विभागामार्फत)
९) निवडनस्ती कार्यासन-१४.